नविन कृष्णा पाणी तंटा लवादा समोर महाराष्ट्र राज्याची बाजू मांडण्याच्या दृष्टीने शासनाचे तांत्रिक सल्लागार म्हणून श्री.नंदकुमार वडनेरे यांची नियुक्ती करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. कृपातंल २०११/(७८/२०१०)/जसंनि
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक- २८/०१/२०११

**प्रस्तावना :-**

नवीन कृष्णा पाणी तंटा लवादासमोर महाराष्ट्र राज्याची बाजू मांडण्याकरिता अपेक्षित असलेल्या रु. २४.४९ कोटी खर्चाच्या अंदाजपत्रकास मान्यता देण्यात यावी असा निर्णय दि.२४.२.२००४ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत घेण्यात आलेला आहे. त्यानुसार शासन परिपत्रक क्र.कृपातंल-२००४/(२१/०४)/ जसंनि, दि.२७.२.२००४ अन्वये नवीन कृष्णा पाणी तंटा लवाद कक्षाच्या कामकाजासाठीच्या रु.२४.४९ कोटी खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. नवीन कृष्णा पाणी तंटा लवादासमोर महाराष्ट्र राज्याची बाजू समर्थपणे मांडण्याच्या दृष्टीने लवादाच्या कामकाजाच्या कायदेविषयक बाबी लक्षात घेऊन तांत्रिक सल्ला देण्यासाठी सल्लागारासाठीच्या खर्चाचा अंतर्भाव सदर अंदाजपत्रकात करण्यात आलेला असून श्री.एस.टी.देवकुळे ,निवृत्त प्रधान सचिव यांची महाराष्ट्र शासनाचे तांत्रिक सल्लागार म्हणून नियुक्ती करण्यात आली होती. तथापि श्री.एस.टी.देवकुळे यांचे डिसेंबर २००९ मध्ये दुखःद निधन झाले आहे.त्यामुळे त्यांच्या जागी नवीन समुपदेशक नेमणे शासनाच्या विचाराधिन होते.

**शासन निर्णय :-**

**२.१** नवीन कृष्णा पाणी तंटा लवादासमोर महाराष्ट्र राज्याची बाजू समर्थपणे मांडण्याच्या दृष्टीने लवादाच्या कामकाजाच्या कायदेविषयक बाबी लक्षात घेऊन तांत्रिक सल्ला देण्यासाठी श्री.नंदकुमार वडनेरे, निवृत्त प्रधान सचिव यांची या शासन निर्णयाच्या दिनांकापासून कृष्णा पाणी तंटा लवादाचा अंतिम निर्णय होईपर्यंत महाराष्ट्र शासनाचे तांत्रिक सल्लागार (Technical Advisor) म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

**२.२** श्री.नंदकुमार वडनेरे, यांना महाराष्ट्र शासनास सल्ला देण्यासाठी दिल्ली येथील कामाकरिता प्रतिदिन रु.१०,०००/- (रु.दहा हजार मात्र) इतके मानधन तसेच मुंबई, पुणे व महाराष्ट्रातील अन्य ठिकाणच्या कामाकरिता प्रतिदिन रुपये ८,०००/-(रु.आठ हजार मात्र) इतके मानधन अनुज्ञेय राहिल. तथापि हे कामकाज दिवसातील ४ तासापेक्षा कमी कालावधीकरिता असल्यास प्रतिदिन अनुज्ञेय मानधनाच्या ५० टक्के मानधन अनुज्ञेय राहील. शासनास सल्ला देण्याच्या कामाच्या अनुषंगाने दूरध्वनी, फॅक्स, झेरॉक्स व टंकलेखन यासाठी सल्लागार यांनी केलेला खर्च मानधनात समाविष्ट राहिल. प्रत्येक

महिन्याचे कामाचे दिवस व केलेल्या कामाबाबतची सविस्तर टिप्पणी दर महिन्यास शासनास सादर करणे आवश्यक राहिल.

२.३ प्रवासाच्या दिवसासाठी व सल्ल्यानिमित्त मुख्यालयाबाहेरील मुक्कामातील बिगर कामाच्या दिवसासाठी प्रतिदिन रु.२८,००/- (रु. दोन हजार आठशे मात्र) इतके मानधन अनुज्ञेय राहील.

२.४ सल्लागारांना शासन निर्देश देईल त्या-त्या वेळेस लवादाशी निगडित कामासाठी उपस्थित रहावे लागेल. कामाच्या, प्रवासाच्या व बिगर कामांच्या दिवसांच्या मानधन अनुज्ञेय असलेल्या दिवसांची प्रत्येक वर्षातील कमाल मर्यादा १५० दिवस इतकी राहील.

२.५ श्री.नंदकुमार वडनेरे, सल्लागार यांचे मुख्यालय पुणे हे राहील. मुख्य अभियंता (कृपातंल) व सहसचिव यांनी किंवा अधीक्षक अभियंता, कृष्णा पाणी तंटा लवाद विशेष कक्ष, पुणे यांनी आमंत्रित केल्यावर दिल्ली, पुणे, मुंबई व इतर ठिकाणी त्यांना लवादाच्या कामासाठी उपस्थित रहावे लागेल. हॉटेलमधील निवासाचा प्रत्यक्षात केलेला खर्च प्रतिपूर्तीसाठी अनुज्ञेय राहील. भोजनादी खर्च (Boarding chargese) मानधनात अंतर्भूत आहे.

२.६ जेथे विमान सेवा उपलब्ध असेल तेथे सल्लागारांना विमान प्रवास अनुज्ञेय राहील. त्यासाठी पूर्व अनुमतीची आवश्यकता भासणार नाही. रेल्वेच्या प्रवासासाठी वातानुकूलित प्रथम वर्ग अनुज्ञेय राहील. कामकाजाच्या ठिकाणी, विमानतळ किंवा रेल्वे स्टेशनवर येताना व जाताना कार अथवा भाडयाची वातानुकूलित कार अनुज्ञेय राहील.

३. यावरील खर्च खालील लेखाशीर्षावर टाकावा.

मागणी क्र.आय-१, २७०१-मोठे व मध्यम पाटबंधारे, ८०-सर्वसाधारण, ८०० इतर खर्च, (०८) कृष्णा पाणी तंटा लवाद, (०८) (०१)-अधीक्षक अभियंता, कृष्णा पाणी तंटा लवाद विशेष कक्ष, पुणे (२७०१-९६५-५) योजनेतर/दत्तमत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या WWW.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक क्र.२०११०१२८१९२२३८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(प्र.ना.घोडके)**
शासनाचे उप सचिव.

प्रत:-

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, जलसंपदा (कृखोपाम वगळून) व लाक्षेवि यांचे स्वीय सहाय्यक.

मा. मंत्री जलसंपदा (कृखोपाम) यांचे स्वीय सहाय्यक.
मा. राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक.
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर.
मुख्य अभियंता (कृपातंल) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सहसचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
आंतरवित्त सल्लागार व सहसचिव जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
अधीक्षक अभियंता, कृष्णा पाणी तंटा लवाद विशेष कक्ष, पुणे.
श्री.नंदकुमार वडनेरे, निवृत्त प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुबई.
कोषागार अधिकारी, पुणे.
कार्यासन जसंनि (संग्रहार्थ).